**सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद या कार्यालयाकरिता लघुलेखक उच्चश्रेणी-२, लघुलेखक निम्नश्रेणी-४ व लिपिक-टंकलेखक-५ अशा एकूण ११ पदांच्या सेवा दि. १७ एप्रिल, २०२३ पासून पुढील ११ महिन्यांकरिता बाह्ययंत्रणेकडून घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२८१६/प्र.क्र.१६०/१६/का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई: ४०० ०३२.
दिनांक: २७ जून, २०२३

वाचा:-
१) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय, क्र.संकिर्ण २८१६/प्र.क्र१९१(भाग १)/१६/का.८, दि.१८ एप्रिल, २०२३
२) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय, क्र.संकिर्ण २८१६/प्र.क्र१६०/१६/का.८, दि. ७ फेब्रुवारी,२०२०
३) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय, क्र.संकिर्ण २८१६/प्र.क्र१६०/१६/का.८, दि. २६ मार्च २०२१
४) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय, क्र.संकिर्ण २८१६/प्र.क्र१६०/१६/का.८, दि.१८ एप्रिल २०२२
५) सह सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई, शाखा औरंगाबाद यांचे पत्र क्र.आस्था- २०२२/ प्र.क्र.०१/४०२, दि.१ मार्च, २०२३.
६) उपसमितीच्या दि.७ जून, २०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त क्र. पदनि- २०२३/प्र.क्र.२७/आपुक, दि.२१ जून, २०२३

**प्रस्तावना:-**

कार्यासन-८ च्या अधिपत्याखालील १३ सरकारी वकील कार्यालयांचा आकृतीबंध उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि १३.१२.२०२२ रोजीच्या बैठकीत मंजूर करण्यात आलेला आहे. सदर सुधारित आकृतीबंधानुसार सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद या कार्यालयाकरिता ७९ नियमित पदे मंजूर करण्यात आलेली असून ३८ पदांच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. विधि व न्याय विभाग, शासन निर्णय,दि.१८.०४.२०२२ अन्वये सरकारी वकील कार्यालयांचा सुधारित आकृतीबंध मंजूर होईपर्यंत अथवा एक वर्ष या कालावधीसाठी, सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद या कार्यालयातील सरळसेवेच्या कोटयातील रिक्त असलेली लघुलेखक उच्चश्रेणी २, लघुलेखक निम्नश्रेणी ४, लिपिक-टंकलेखक-५ व शिपाई १० अशी एकूण २१ काल्पनिक पदे निर्माण करुन त्या पदांच्या सेवा बाह्ययंत्रणेकडून करुन घेण्यास मान्यता देण्यात आली होती. सदर मान्यता दि. १७ एप्रिल २०२३ रोजी संपुष्टात आलेली आहे. सह सचिव, विधि व न्याय विभाग, औरंगाबाद यांनी संदर्भ क्र. ५ येथील पत्रान्वये सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांच्या आस्थापनेवरील रिक्त पदे बाह्ययंत्रणेव्दारे भरण्यास मंजूरी देण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला होता. त्यानुषंगाने त्यांच्या कार्यालयातील लघुलेखक उच्चश्रेणी- २, लघुलेखक निम्नश्रेणी- ४ व लिपिक-टंकलेखक-५ अशा एकूण ११ पदांच्या सेवा दि. १७ एप्रिल, २०२३ पासून पुढील एक वर्षाकरिता अथवा रिक्त पद भरण्याची कार्यवाही होईपर्यंत बाह्ययंत्रणेकडून घेण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव उपसमितीच्या दि. ७ जून २०२३ रोजीच्या बैठकीत सादर करण्यात आला होता व सदर प्रस्तावास उपसमितीने मान्यता दिलेली आहे.

**शासन निर्णयः-**

उपसमितीच्या दि.७ जून,२०२३ रोजी पार पडलेल्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार, सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद या कार्यालयाकरिता लघुलेखक उच्चश्रेणी-२, लघुलेखक निम्नश्रेणी-४ व लिपिक-टंकलेखक-५ अशा एकूण ११ पदांच्या सेवा दि. १७ एप्रिल, २०२३ पासून पुढील ११ महिन्याकरिता बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. बाहययंत्रणेकडून सेवा उपलब्ध करुन घेण्यासंदर्भात वित्त विभागाने वेळोवेळी शासन परिपत्रकान्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच, बाहययंत्रणेकडून सेवा उपलब्ध करुन घेताना प्रचलित कायदयाचा भंग होणार नाही याची काळजी कार्यालय प्रमुखांनी घ्यावी.

३. यावर होणारा खर्च मागणी क्र.जे-०१, लेखाशीर्ष २०१४, न्यायदान, ११४, विधि सल्लागार व समुपदेशी (००) (०१) विधि सल्लागार व समुपदेशी, (शहर अधिकारी) (दत्तमत) (अनिवार्य) १०-कंत्राटी सेवा (२०१४ ०२९९) खाली खर्ची टाकून तो चालू सन २०२३-२०२४ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर व वितरित केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. वित्त विभाग, शासन निर्णय दि.०९.०६.२०१७ अन्वये गठित, अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, यांच्या उपसमितीच्या दि.७ जून,२०२३ रोजीच्या बैठकीत प्राप्त मान्यतेनुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून, त्याचा सांकेतांक क्र. २०२३०६२७१७५५०१८८१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJESH BAJIRAO GHADGE

Digitally signed by RAJESH BAJIRAO GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=cf72ed51d101be222757ea3b6d64ed5fc5de8f8529121e097e2203b90069afce, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5D6F97DBFEFD0A526C757773EA06AC43B9D1DC7C582C6F4747CD504E990F85FF, cn=RAJESH BAJIRAO GHADGE
Date: 2023.06.27 17:56:59 +05'30'

**(रा. बा. घाडगे)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव व वरिष्ठ विधि सल्लागार, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
४) सह सचिव, कार्यासन-८, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सह सचिव, विधि व न्याय विभाग, जुनी उच्च न्यायालय इमारत, अदालत रोड, औरंगाबाद.
६) सरकारी वकील, सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, जालना रोड, खंडपीठ औरंगाबाद.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
८) कार्यासन अधिकारी, विधि व न्याय विभाग (कार्यासन-२३), मंत्रालय, मुंबई.
९) कक्ष अधिकारी, (आपुक/व्यय-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवडनस्ती (कार्यासन-८).